भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “कनिष्ठ भूवैज्ञानिक” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या- २०१९

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना-०२१९/प्र.क्र.७४/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुबई ४०० ००१
तारीख: १८ फेब्रुवारी, २०२०

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ अन्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील "कनिष्ठ भूवैज्ञानिक" संवर्गातील अधिकारी श्री. नंदकिशोर मनोहर बोरकर यांची दिनांक ३१/०५/२०१९ रोजीच्या आदेशान्वये ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गोंदिया येथून वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलढाणा येथे प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात आली होती. या आदेशाविरोधात श्री.बोरकर, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे मूळ अर्ज क्रमांक ८३६/२०१९ अन्वये याचिका दाखल केली आहे. या याचिकेत मा.न्यायाधिकरणाने दिनांक ११/१०/२०१९ रोजी अंतरिम आदेश देऊन श्री. बोरकर, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या बदलीबाबत शासन निर्णय दिनांक ११/०७/२०००, दि.०६/०८/२००२ आणि दि. ०७/०१/२००६ व तदनुषंगिक शासन निर्णयानुसार निर्णय घेण्याच्या सूचना दिल्या आहेत.

मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथील मूळ अर्ज क्रमांक ८३६/२०१९ मधील दिनांक ११/१०/२०१९ रोजी आदेशानुसार श्री. नंदकिशोर मनोहर बोरकर, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांची वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा येथे झालेली बदली रद्द करून त्यांची पदस्थापना वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर येथील रिक्त पदावर करण्यात येत आहे. सदर आदेश मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथील मूळ अर्ज क्रमांक ८३६/२०१९ मधील अंतिम आदेशाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

बदली आदेशाची तात्काळ व कार्यक्षमरित्या अंमलबजावणी होण्याकरीता पुढील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे:-

१. बदली झालेले अधिकारी त्यांच्या संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुखास व आस्थापना अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल.

२. सदरहू आदेशान्वये पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे. पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास अथवा बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्याची नोंद घेण्यात यावी. तसेच सदर कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम क्रमांक ३ (तीन) व नियम क्रमांक २३ चा भंग करणारी असल्यामुळे असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करून ते बदली झालेल्या कार्यालयात रूजू झाले आहेत किंवा कसे, याची माहिती तात्काळ शासनास सादर करण्याबाबत संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१८११३७०३४९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.02.18 12:29:02 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री. नंदकिशोर मनोहर बोरकर, कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा. (संचालनालयामार्फत)

**प्रत-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर, अमरावती.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित सर्व जिल्हे.
७. निवडनस्ती कार्यासन, पापु-१५.